महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य)...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मफुवि-१४२३/प्र.क्र.८६/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७/०३/२०२४

**संदर्भ:-** १) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
२) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय सम क्रमांक, दि.१२.०५.२०२३, दि.१४.०९.२०२३.
३) नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांचे पत्र जा क्र.मफुकृवि/लेखा-२/ १०३९ व १०६०, दि.१४.०२.२०२४ व दि.२१.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वित्त विभाग,शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ अन्वये वित्तीय वर्ष सन २०२३-२४ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीय निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत २०:२०:३० या प्रमाणात बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती.

त्यानुसार महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास अनिवार्य खर्चाअंतर्गतच्या (२४१५ ००२५) व (२४१५ ०१९७) या लेखाशिर्षाखालील ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता एकूण वार्षिक तरतूदीच्या ३० टक्के निधी उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दि.१२.०५.२०२३ व दि.१४.०९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

नियंत्रक,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये राहुरी कृषि विद्यापीठाकरीता अनिवार्य योजनांसाठी ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याबाबत निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी या विद्यापीठास अनिवार्य खर्चाअंतर्गतच्या (२४१५ ००२५) व (२४१५ ०१९७) या लेखाशिर्षाखालील ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता संदर्भ क्र.१ येथील दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकान्वये चालू आर्थिक वर्षात अनिवार्य तरतूदींकरीता निश्चित केलेल्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास २४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१-पीकसंवर्धन (२४१५ ००२५) व ०३-पशुसंवर्धन (२४१५ ०१९७) (अनिवार्य) ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीकरीता एकूण रु.४६८.०८ लाख (अक्षरी रुपये चार कोटी,अडुसष्ट लाख, आठ हजार फक्त) एवढे अनुदान सुधारित अंदाजाच्या मर्यादेत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२३-२४ | सुधारित अंदाज सन २०२३-२४ | चालू आर्थिक वर्षात यापुर्वी वितरीत निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १) | मागणी क्र. डी-३, १२०, इतर संस्थांना सहाय्य, (००)(०१) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान | ०१,पीकसंवर्धन (२४१५ ००२५) ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) | ११५८.७५ | ८११.१३ | ३४७.६२५ | ४६३.०० |
| २) | | ०३,पशुसंवर्धन (२४१५ ०१९७) ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) | १२.७१ | ८.९० | ३.८११ | ५.०८ |
| | | **एकूण** | **११७१.४६** | **८२०.०३** | **३५१.४३६** | **४६८.०८** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.
२. कृषि विद्यापीठांनी योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.
३. वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/ योजनांसाठी/ बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.
४. ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.
५. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश/ कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन

महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६. कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच,महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७. विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखासंहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. यासाठी होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान, कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११४/२०२४/व्यय-१,दि.१३.०३.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२७१७५३५०२३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.27 18:04:03 +05'30'

(मिताली चौधरी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
३. कुलगुरु /कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
५. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.

६. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी,अहमदनगर/उपकोषागार अधिकारी,राहुरी,जि.अहमदनगर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११.उपमुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई.
१३.उप सचिव, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.